**मौजे डिग्रज (ता. मिरज जि. सांगली) येथील पुरसंरक्षक योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
शासन निर्णय क्र. पुसंयो- २०१०/(१३९/१०)/सिंव्य(कामे)
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक :- २१/१२/२०१०**

पहा :- कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र क्र.जा.क्र.मकृखोविम/५८१०/८६६/१०/सिं १-/ पू.सं.-४६/ दि.०४.१०.२०१०

**प्रस्तावना :-**

मौजे डिग्रज ता. मिरज जि. सांगली हे गांव सांगलीपासून १० किमी अंतरावर कृष्णा नदीकाठाचे डाव्या तीरावर वसलेले आहे. पावसाळयात वारंवार नदीस येणाऱ्या पुरामुळे मौजे डिग्रज गावठाणाच्या नदीकडील भागाची धूप टाळण्यासाठी या ठिकाणी पूर संरक्षक काम करण्यात आले आहे. या पुरसंरक्षक कामास शासन निर्णय क्र.पुसंयो २००६/(२८/२००६)/सिं.व्य.(कामे) दि.०१.०६.२००६ अन्वये रु.६७.९७ लक्ष किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे.

सद्यस्थितीमध्ये सदर काम ९० टक्के पूर्ण झाले आहे. परंतु क्षेत्रिय परिस्थितीनुसार कृष्णा नदीपात्रातील वाळू उपशामुळे निर्माण झालेल्या डोहामध्ये कायम स्वरुपी पाणी साचून रहाते, त्या ठिकाणी टो वॉलचे काम कॉफरडॅमसह करणे, कृष्णा नदीच्या घाटाच्या खालील बाजूस पूरसंरक्षक भिंतीची लांबी वाढविणे, स्थानिक लोकप्रतिनिधीच्या मागणीनुसार नदीपात्रात जादा पायऱ्या व रस्ता संधानकात करणे, इत्यादी वाढीव कामाची आवश्यकता आहे.

कार्यक्षेत्रातील परिस्थितीचा विचार करुन कामाच्या व्याप्तीतील वाढ व अनुषंगीक व इतर खर्चात झालेली वाढ इत्यादी कारणामुळे अंदाजपत्रकीय खर्चात वाढ झाली आहे. त्यानुषंगाने मौजे डिग्रज, ता. मिरज, जि. सांगली येथील पुरसंरक्षक कामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयाद्वारे मौजे डिग्रज (ता. मिरज जि. सांगली) येथील पुरसंरक्षक भिंत बांधण्याचा अनुक्रमे रु.९२.३७ लक्ष (रुपये ब्याण्णव लक्ष सदोतीस हजार मात्र) (कामाप्रित्यर्थ रु.८३.५१ लक्ष (रुपये त्र्याऐंशी लक्ष एकावन्न हजार मात्र) व अनुषंगीक खर्च रु.८.८६ लक्ष (रुपये

आठ लक्ष शहाऐंशी हजार मात्र) ) इतक्या खर्चास खालील अटीच्या अधिन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) शासन परिपरित्रक क्र.एफडीब्ल्यु १०९२/(१७०/९२)/सिंव्य(कामे), दि. ७/८/१९९२ नुसार १० टक्के लोकवर्गणी प्रत्यक्ष जमा झाल्याशिवाय किंवा स्थानिक संस्था १० टक्के लोकवर्गणीचा खर्च सोसावयास तयार असल्याबाबतचे प्रमाणपत्र प्रत्यक्ष प्राप्त झाल्याशिवाय कामाला सुरुवात करु नये.

२) या कामावर होणारा खर्च ४७११-पूर नियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१)(०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भाग भांडवल अंशदान या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखालील उपलब्ध होणा-या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सुधारित अंदाजित खर्चाच्या मंजुरीपेक्षा अधिक खर्च करण्यात येऊ नये.

३) सदर योजना पुर्ण झाल्यानंतर मौजे डिग्रज ग्रामपंचायत यांनी या योजनेची देखभाल व दुरुस्ती करावयाची आहे.

४) या योजनेस प्रदान केलेली सुधारित प्रशासकीय मान्यता सिं.व्य.(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ४ सन २०१०-११ वर नोंदविण्यात आली आहे.

हा शासन निर्णय क्रमांक संकीर्ण १०९९/(१२६/०९) मो.प्र.(प्र) दि.१८ मे १९९९ च्या (१)अ मधील तरतुदीनुसार पुर्तता होत असल्याने आंतरवित्त सल्लागार व सहसचिव यांच्या सहमतीने विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थावर (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संगणक सांकेतांक २०१०१२२११९१८४३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( पी. टी. केदारे )
शासनाचे अवर सचिव

प्रत :-

महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
स्वीय सहाय्यक, सचिव (जलसंपदा) मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
मुख्य अभियंता (पा.) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
उपसचिव (सिं.व्य.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
आंतरवित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली
अवर सचिव, सिं.व्य.(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबइ
कार्यकारी अभियंता, सांगली पाटबंधारे विभाग, सांगली
ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.